**शैक्षणिक वर्ष २०१७-१८ :**
**अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये**
**नवीन विषयांना मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक एनजीसी-२०१७/(१०१/१७)/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक : २३ जून, २०१७.

**संदर्भ:** १. शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१०/(१९३/१०)/मशि-४, दि. ३०.१०.२०१०.
२. शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१२/(२४७/१२)/मशि-४, दि. ०२.०९.२०१३.
३. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/(५६/१७)/मशि-४, दि. ०७.०४.२०१७.

## शासन आदेश

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६, दि. ०१.०३.२०१७ पासून अंमलात आलेला असल्यामुळे व त्यानुषंगाने नविन निकष विहित करण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यात असल्यामुळे शैक्षणिक वर्ष २०१७-१८ करीता नविन विषय व तुकडयांसाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावांबाबत संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयातील विहित केलेल्या निकषांप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल, असा निर्णय संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला. त्यानुसार महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ व ८३ अणि संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील अकृषि विद्यापीठांनी शैक्षणिक वर्ष २०१७-१८ साठी नवीन अतिरिक्त तुकड्यांचे प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे सादर केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१२/(२४७/१२)/मशि-४, दि. २ सप्टेंबर, २०१३ अन्वये तपासणी करण्यात आली. विद्यापीठांच्या शिफारशींच्या अनुषंगाने शासन स्तरावर केलेली तपासणी वा महाविद्यालयांनी प्राप्त केलेला नॅक दर्जा विचारात घेऊन पात्र ठरलेल्या प्रस्तावांना महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन अतिरिक्त तुकड्यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र | अ. क्र. | संस्थेचे व महाविद्यालयाचे नाव व पत्ता | विषय |
|---|---|---|---|
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | १ | गव्हर्नमेंट ऑफ महाराष्ट्राचे ईस्माइल युसुफ कॉलेज ऑफ आर्टस,सायन्स ॲन्ड कॉमर्स जोगेश्वरी (पू), मुंबई-४०००६० | टी.वाय.बी.कॉम-(बिझनेस मॅनेजमेंट) |
| २. | २ | नगिनदास खांडवाला कॉलेज ऑफ कॉमर्स,आर्टस ॲन्ड मॅनेजमेंट स्टडीज ॲन्ड शांताबेन नगिनदास खांडवाला कॉलेज ऑफ सायन्स भद्रन नगर, रोड नं.१ एस.व्ही.रोड समोर, मालाड (पु.), मुंबई-४०००६४ | एफ.वाय.बी.ए. -(फ्रेंच) |

| अ. क्र | अ. क्र. | संस्थेचे व महाविद्यालयाचे नाव व पत्ता | विषय |
|---|---|---|---|
| ३. | ३ | गोखले एज्युकेशन सोसायटीचे एन.बी.मेहता (वलवाडा) सायन्स कॉलेज बोर्डी, जि.पालघर-४०१७०१ | एम.एस्सी.(फिजीक्स पार्ट-१ बाय पेपर्स) |
| ४. | ४ | सुधागड एज्यूकेशन ट्रस्टचे शेठ ज. नौ. पालीवाला कॉमर्स, सायन्स अॅन्ड आर्टस कॉलेज पाली, ता. सुधागड, जि. रायगड-४१०२०५ | टी.वाय.बी.ए.( इकोनॉमिक्स) (६ युनिट)<br>टी. वाय.बी.ए. (जॉग्रॉफी)(६ युनिट) |
| ५. | ५ | कोकण ज्ञानपीठाचे कर्जत कॉलेज ऑफ आर्टस, सायन्स अॅन्ड कॉमर्स लडावली, पो. तिवरे, वेणगाव रोड,ता.कर्जत, जि. रायगड-४१०२०१ | एम. एस्सी. (इनऑरग्यानिक केमिस्ट्री) (बाय पेपर्स) |
| ६. | ६ | न्यायमुर्ती तात्यासाहेब आठल्ये कला, वेद. शं. रा. सप्रे वाणिज्य आणि विधीज्ञ दादासाहेब पित्रे विज्ञान महाविद्यालय पो. देवरूख, ओझरे रोड,ता. संगमेश्वर, जि. रत्नागिरी-४१५८०४ | एम.एस्सी.(अॅनलेटिकल केमिस्ट्री)<br>एम.एस्सी.(फिजीक्स) |
| ७. | ७ | कृष्णराव सिताराम देसाई शिक्षण मंडळाचे एस. के. पाटील सिंधुदूर्ग महाविद्यालय अॅन्ड रामभाऊ परुळेकर ज्यु.कॉलेज, धुरीवाडा, मालवण, जि.सिंधुदूर्ग-४१६६०६ | बी.ए.(इंग्लीश ६ युनिट) |
| ८. | ८ | के.एम.एस.पी.मंडळाचे संत राऊळ महाराज महाविद्यालय कुडाळ, जि. सिंधुदूर्ग-४१६५२० | एम.एस्सी.(ऑरग्यानिक केमिस्ट्री) (०-१०)<br>एम.एस्सी (झुऑलॉजी) (ओशॉनॉग्राफी अॅन्ड फिशरी सायन्स) (०-१०) |
| ९. | ९ | दि साउथ इंडियन असोसियशनचे द एस.आय.ए. कॉलेज ऑफ हायर एज्यूकेशन प्लॉट नं.८८, एम.आय.डी.सी. रेसिडेनशिअल निवासी विभाग, जिमखाना रोड, डोंबिवली (पू), ठाणे-४२१२०३ | टी.वाय.बी.कॉम (एक्सपोर्ट मार्केटिग) |
| १०. | १० | दि कोकण मुस्लीम एज्यूकेशन सोसायटीचे जी. एम. मोमीन वुमन कॉलेज - रईस हायस्कुल कॅम्पस, ठाणा रोड, भिवंडी, जि. ठाणे - ४२१ ३०२ | एक्सटेंशन अॅक्टीव्हिटीज -<br>(डी. एल. एल. ई) |
| ११. | ११ | डी. एस. पी. मंडळाचे के. व्ही. पेंढारकर कॉलेज ऑफ आर्टस, सायन्स अॅन्ड कॉमर्स, प्लॉट नं. एसपीएल - ४, एम. आय. डी. सी. ऑफिस समोर, डोंबिवली (पू.), जि. ठाणे - ४२१ २०३ | एम. ए. (हिस्ट्री) |
| | | **सोलापूर विद्यापीठ, सोलापूर** | |
| १२. | १ | सी.बी.खेडगीज बसवेश्वर सायन्स, राजा विजयसिंह कॉमर्स, राजा जयसिंह आर्टस कॉलेज, अक्कलकोट - ४१३ २१६, जि. सोलापूर | बी.एस्सी . भाग-३ वनस्पतीशास्त्र (२०) |

| अ. क्र | अ. क्र. | संस्थेचे व महाविद्यालयाचे नाव व पत्ता | विषय |
|---|---|---|---|
| | | **उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव** | |
| १३. | १ | श्री सरस्वती विद्या प्रसारक मंडळ श्रीमती पी के कोटेचा कला वाणिज्य व विज्ञान महिला महाविद्यालय शांतीनगर, भुसावळ ता.भुसावळ जि.जळगाव | बी.एस्सी. [भौतिक शास्त्र (विशेष/मुख्य) [तृतीय वर्ष], वनस्पति शास्त्र (विशेष/मुख्य) [तृतीय वर्ष]] |
| १४. | २ | खान्देश कॉलेज एज्युकेशन सोसायटीचे, मूळजी जेठा महाविद्यालय जळगाव सी.एस. क्रमांक. ७३२३, ७४८०, डी.आय. सी.च्या मागे,जळगाव जि.जळगाव | बी.ए. [लॉजिक अँड मेथोडॉलॉजी ऑफ सायन्स (दुय्यम/सर्व साधारण) [प्रथम वर्ष] |
| १५. | ३ | गंगामाई एज्युकेशन ट्रस्ट्चे कला वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय नगांव ता.धुळे, मुक्काम पोस्ट नगाव ता.धुळे जि.धुळे | बी.ए. [संरक्षणशास्त्र (विशेष/मुख्य) [व्दितीय वर्ष], अर्थशास्त्र (विशेष/मुख्य) [व्दितीय वर्ष], मानसशास्त्र (विशेष/मुख्य) [व्दितीय वर्ष], समाजशास्त्र (विशेष/मुख्य) [व्दितीय वर्ष]] |
| | | **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर** | |
| १६. | १ | सिंधी हिंदी विद्या समिती काका तिलोकचंद रूघवानी मार्ग, पाचपावली,नागपुर - काका तिलोकचंद, पाचपावली नागपुर शहर | बी.एस्सी. - संगणक विज्ञान - (माध्यम - इंग्रजी) |
| | | **संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती** | |
| १७. | १ | विदर्भ शिक्षण प्रसारक मं, खामगाव संचलित गो. से. विज्ञान, कला व वाणिज्य महाविद्यालय, खामगांव, जि. बुलडाणा | बी.एस्सी.भाग १ (मायक्रोबायोलॉजी) (१००) |
| | | **श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई** | |
| १८. | १ | सेवा मंडळ एज्यूकेशन सोसायटी श्रीमती मनिबेन एम.पी.शहा वुमेन्स कॉलेज ऑफ आर्टस अॅन्ड कॉमर्स ३३८, आर.ए.किडवाई रोड माटुंगा, मुंबई ४०००१९ | एम.कॉम (अॅडव्हांस मॅनेजमेंट अकांउंटींग अॅन्ड ऑडिटींग) (इंग्रजी माध्यम) बी.ए. (इकॉनॉमिक्स) (इंग्रजी माध्यम) |
| १९. | २ | श्री.एम.डी.शहा महिला कॉलेज ऑफ आर्टस अॅन्ड कॉमर्स, मालाड, मुंबई ४०००६४ | एम.ए (इतिहास) (इंग्रजी माध्यम) एम.कॉम (मार्केटिंग मॅनेजमेंट) (इंग्रजी माध्यम) |
| २०. | ३ | श्री. चंदुलाल नानावटी वूमेन्स इन्स्टिट्युट अॅण्ड गर्ल्स हायस्कूल, मनिबेन नानावटी वूमेन्स कालेज, वल्लभभाई रोड, विलेपार्ले, मुंबई | एम.कॉम - (अॅडव्हान्स फायनॅनसिअल मॅनेजमेंट अॅण्ड ऑडिटिंग) (इंग्रजी माध्यम) |
| २१. | ४ | महर्षी कर्वे स्त्री शिक्षण संस्था, स्कूल ऑफ फॅशन टेक्नॉलॉजी १३/१/२ नरहे आंबेगाव तक्षशीला सोसायटी, जेएसपीएम इंजिनिअर कॉलेजच्या मागे पुणे - ४११०५२ | बी. डिझाईन - (ज्वेलरी डिझाईन) (इंग्रजी माध्यम) |

| अ. क्र | अ. क्र. | संस्थेचे व महाविद्यालयाचे नाव व पत्ता | विषय |
|---|---|---|---|
| | | **शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर** | |
| २२. | १ | विवेकानंद कॉलेज, २१३०, ई, ताराबाई पार्क, कोल्हापूर | एम.एस्सी. - पदार्थविज्ञान |
| २३. | २ | शिवराज साहित्य, वाणिज्य आणि डी.एस.कदम विज्ञान महाविद्यालय, गडहिंग्लज, जि. कोल्हापूर | बी.एस्सी. - ३ (गणित)<br>एम.एस्सी. - १ ऑरगॅनिक केमेस्ट्री |
| २४. | ३ | मा. श्री अण्णासाहेब डांगे कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, हातकणंगले जि. कोल्हापूर | एम.ए.भाग - १ इंग्रजी |
| २५. | ४ | देवचंद कॉलेज, अर्जुननगर मु.पो. अर्जुननगर, ता.कागल, जि. कोल्हापूर. | एम.एस्सी - भाग १ व २- पदार्थविज्ञान<br>बी.ए.भाग - ३- भूगोल<br>बी.एस्सी.भाग ३ - इलेक्ट्रॉनिक्स<br>बी.एस्सी.भाग २ व ३ - सुक्ष्मजीवशास्त्र |
| २६. | ५ | राजे रामराव महाविद्यालय, जत.जि. सांगली | बी.एस्सी.- भाग ३ (तुकडी क्र. २ व ३) (२४०) |
| २७. | ६ | पद्मभूषण डॉ. वसंतरावदादा पाटील महाविद्यालय, तासगांव ता. तासगांव,<br>जि. सांगली. | एम.एस्सी भाग १ -संख्याशास्त्र<br>एम.ए.भाग १ -इतिहास<br>एम.कॉम. भाग -अकौंटन्सी |
| २८. | ७ | बाळासाहेब देसाई कॉलेज, पाटण, ता. पाटण, जि. सातारा | एम.ए.भाग - १ राज्यशास्त्र |
| २९. | ८ | लाल बहादूर शास्त्री कॉलेज ऑफ आर्टस, सायन्स ॲण्ड कॉमर्स, १७ मल्हार पेठ, सातारा. | एम.एस्सी. भाग -१ झूलॉजी (Animal Physiology)<br>बी.एस्सी. भाग- ३ संख्याशास्त्र |
| ३०. | ९ | यशवंतराव चव्हाण इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स,सातारा - ४१५००१ | एम.एस्सी.भाग- १ इलेक्ट्रॉनिक्स |

२. **अटी व शर्ती :-**

१. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात नवीन विषय मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.
२. महाविद्यालयाने हमीपत्र सादर केल्याशिवाय किंवा तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.
३. महाविद्यालयांनी, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी ३० ऑगस्ट पर्यंत करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.
४. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

६. संबंधित विद्यापीठांनी, वरील विवरणपत्रातील महाविद्यालयांनी प्रकरणपरत्वे नॅक मुल्यांकन/ पुनर्मुल्यांकन करुन घेण्यासाठी पाठपुरावा करावा.

३. विद्यापीठांनी संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

४. संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नविन विषयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर नविन विषयांसाठी मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर नविन विषयांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२२१४२६२४३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rohini Bhalekar

Digitally signed by Rohini Bhalekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=440c600559857f4234e969f892346c88247ac81346a1b7229bf9917deb7bce48, cn=Rohini Bhalekar
Date: 2017.06.23 17:46:54 +05'30'

**( रोहिणी भालेकर )**
**उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण**
**विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
४) संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
५) निवड नस्ती (मशि-४)